# हेरिएट टबमॅन

## ध्रुवताऱ्याकडे निघाली

वायलेट फाइंडली

मराठी : अश्विनी बर्वे






हैरियट टबमॅन फक्त पाच फुट उंचीच्या होत्या. त्या लिहू-वाचू शकत नव्हत्या. तरीही त्यांनी शेकडो आफ्रिकी अमेरिकनांना स्वतंत्र जीवन जगण्यासाठी त्यांनी मदत केली. या अद्भुत महिलेचे जीवन खरोखरच विलक्षण होते.







हैरियट टबमॅनचा जन्म १८२०च्या आसपास मैरीलैंड मध्ये झाला. त्या काळात दक्षिणेत काही लोकांकडे गुलाम होते. हेरिएट पण एक गुलाम होती. तिचे आई-वडील, भाऊ आणि बहिणी सगळे गुलाम होते.

गुलामांचे मालक गोरे लोक होते. गुलाम स्वयंपाक करत,शेतात काम करत आणि त्यांचे मालक जे काही सांगत ती सर्व कामे ते करत होते. दासांना कोणतेही वेतन मिळत नव्हते. त्यांना कधीही त्यांच्या कुटुंबापासून कोणत्याही मालकाला विकले जात असे.




छोटी हैरियट आणि तिचा परिवार एका घाणेरड्या फरशीच्या मोठ्या केबिन मध्ये राहत होते. त्यांचं छोटेसे घर त्यांच्या मालकाच्या मोठ्या शेताच्या जमिनीवर होते.




हेरिएट कधी शाळेत गेली नाही. तिने बालपणी सुद्धा मोठ्यांसारखे काम केले, तिने गोऱ्या कुटुंबातील मुलांची काळजी घेतली आणि त्यांच्या घराची सफाई केली. त्यानंतर ती शेतात काम करत असे, पाणी देत असे आणि लाकडं फोडत असे.



एक दिवस सकाळी, एक गुलाम पळून गेला. गोऱ्या मालकाने गुलामाला थांबवण्यासाठी त्याच्यावर एक जड वस्तू फेकून मारली होती. हैरियट रस्त्यात होती म्हणून ती जड वस्तू हेरिएटच्या डोक्याला लागली.मग तिला वाईट पद्धतीने लागलं आणि ती खूप आजारी पडली.




हैरियटच्या आईने तिची खूप काळजी घेतली,पण त्या जखमेची मोठी खूण हैरियटच्या कपाळावर राहिली. या अनुभवानंतर हैरियटने स्वतःच पळून जाण्याचा निर्णय घेतला.




तो दिवस १८४९मध्ये आला. संध्याकाळी आकाशात अंधार झाला पण कोणी हेरिएटला जंगलात घुसलेलं पाहिलं नाही. ती उत्तरी राज्याकडे निघाली. जिथं गुलामगिरी नव्हती.




अंडरग्राउंड रेलमार्गाने रस्त्यात हेरिएटला मदत केली. हा ट्रेनच्या रूळांचा मार्ग नव्हता.हा एक असा मार्ग होता ज्यामुळे गुलाम पळून स्वतंत्र होवू शकत होते. लोक गुपचूप गुलामांना आपल्या घरात लपून ठेवत होते, त्यांना जेवायला देत होते आणि त्यांना पुढचा रस्ता सांगत होते.




हा नक्शा हैरियटचा
प्रवास दाखवतो.



हैरियट च्या प्रवासात लांबलेली थंडी खूपच भयानक होती. पण त्या मार्गाने शुर हैरियट, फिलाडेल्फिया, पेनसिल्वेनियाला पोहचली..

शेवटी हैरियट उत्तरेत पोहचली. आता ती स्वतंत्र होती. आता तिचा कोणी मालक नव्हता. आता कोणी तिला आदेश देवू शकणार नव्हता.







हैरियटला एका हॉटेलमध्ये नोकरी मिळाली. हैरियटने जे पैसे मिळवले, ते तिने दुसऱ्या गुलामांना पळण्यासाठी वापरले.आपल्या जीवनकाळात तिने दक्षिणेच्या कितीतरी प्रवास केले .अशा प्रकारे तिने ३०० पेक्षा अधिक गुलामांना स्वतंत्र केले.

गुलामांच्या मालकांनी हैरियटला पकडण्यासाठी एक मोठं बक्षीस ठेवलं.पण ती हुशार महिला कधीही पकडली गेली नाही. “मी आठ वर्षापर्यंत अंडरग्राउंड रेलमार्गावर एक कंडक्टर होते," ती म्हणाली. “आणि मी कधीही एकाही प्रवाशाला गमावलं नाही.”






हैरियटने अन्यप्रकारे सुद्धा गुलामांची लढाई लढली. गृहयुद्धाच्या वेळी, तिने दक्षिणेत हेरगिरी करून उत्तरेला मदत केली. तिने एका नर्सच्या रुपात काम केलं.

१८६५ मध्ये, हैरियटचे सगळ्यात मोठे स्वप्नं तेव्हा खरे ठरले जेव्हा शेवटी गुलामगिरी संपली. ९३ वर्षाची असतांना हेरियटचा मृत्यू झाला. पण तिची वीरता अजूनही ध्रुव ताऱ्यासारखी चमकत आहे.